नंदूरबार जिल्हा परिषदेच्या अध्यक्ष, उपाध्यक्ष व विषय समिती सभापती निवासस्थान बांधकामास प्रशासकीय मान्यता.

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २०१०/प्र.क्र.७२(१)/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १४ मे, २०१०

संदर्भ :- अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,नंदूरबार यांचे पत्र क्र.जिपन/बांध/प्रई ४१४७/१०,दि. १८.३.२०१०

प्रस्तावना :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., नंदूरबार यांनी संदर्भीय दिनांक १८.३.२०१० च्या पत्रान्वये नवनिर्मित नंदूरबार जिल्हा परिषदेच्या अध्यक्ष, उपाध्यक्ष व विषय समिती सभापती निवासस्थानाच्या बांधकामास प्रशासकीय प्रशासकीय मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

२. यापूर्वी नवनिर्मित नंदूरबार जिल्हा परिषदेच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकाम तसेच वर्ग-१ व वर्ग-२ चे अधिकारी, वर्ग-३ व वर्ग-४ कर्मचारी यांच्या निवासस्थान इमारतीच्या एकूण रु. २३९७.७२लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास दिनांक ११ मे,२००९ च्या शासन निर्णयान्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली असून, सदरील कामे अंतिम टप्प्यात आहेत. आता, नवनिर्मित जिल्हा परिषदेच्या अध्यक्ष, उपाध्यक्ष तसेच पदाधिकारी यांच्या निवासस्थानाचे बांधकाम हाती घेण्याच्या दृष्टीने अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,नंदूरबार यांनी संदर्भीय पत्रान्वये सविस्तर प्रस्ताव सादर केला आहे. त्यामध्ये जिल्हा परिषदेचे अध्यक्ष यांच्या निवासस्थानाकरीता मुख्य वास्तुविशारद, सा.बां.वि.,मुंबई यांच्याकडील अनुज्ञेय असलेला क्र.टी/आरइएस/ ५१५४ हा नमुना नकाशा वापरण्यात आला आहे. या करीता रु.१,०२,०२,२८६/- किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. उपाध्यक्ष व विषय समितीचे सभापती यांच्या निवासस्थानासाठी मुख्य वास्तुविशारद, सा.बां.वि.,मुंबई यांच्याकडील अनुज्ञेय असलेला क्र.टी/डीएएन/आरइएस-२२ हा नमुना नकाशा वापरण्यात आला आहे. या करीता रु.२,६८,५१,४७०/- किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारीत सदरील अंदाजपत्रके शाखा अभियंता व उप विभागीय अभियंता यांनी तयार केले असून, कार्यकारी अभियंता यांनी साक्षांकित केले आहेत. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प., नंदूरबार यांनी प्रस्तावा सोबत कामाचे सविस्तर अंदाजपत्रक, नमुना नकाशे, साईट प्लॅन इ.कागदपत्रे सादर केलेली आहेत.

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,नंदूरबार यांनी सादर केलेल्या वरील प्रस्तावाच्या छाननी अंती, नंदूरबार जिल्हा परिषदेच्या अध्यक्ष निवासस्थानाच्या रु.९७,३३,०००/- तसेच उपाध्यक्ष व विषय समिती सभापती निवासस्थानाच्या रुपये २,५९,६३,०००/- अशा एकूण रुपये ३,५६,९६,०००/- इतक्या सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

नंदूरबार जिल्हा परिषदेच्या जिल्हा परिषदेच्या अध्यक्ष निवासस्थानाच्या रुपये ९७,३३,०००/- तसेच उपाध्यक्ष व विषय समिती सभापती निवासस्थानाच्या रुपये २,५९,६३,०००/- अशा एकूण सात निवासस्थानाच्या रुपये ३,५६,९६,०००/- (रुपये तीन कोटी छप्पन्न लक्ष श्याहन्नव हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प., नंदूरबार यांनी नियोजन करावे.

(२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

(३) या कामी मंजूर प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो जिल्हा परिषदेने सोसावा.

(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

३. नंदूरबार जिल्हा परिषदेच्या अध्यक्ष, उपाध्यक्ष व विषय समिती सभापती निवासस्थान बांधकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| ( A ) GENERAL ABSTRACT for ZP PRESIDENT RESIDENTIAL QUARTER | | |
|---|---|---|
| Sr | Work Details | Amount (in Rs) |
| 1 | Cost of Civil Work | 4870042.00 |
| 3 | Add 11% for Electrification Charges | 535704.62 |
| 4 | Add 8% for External water supply & Sanitation Charges | 389603.36 |
| 5 | Add 4% for Contingencies Charges | 194801.68 |
| 6 | Add 2% for Computerisation Charges | 97400.84 |
| 7 | Add 6% for Price Variaiion Rate Charges | 292202.52 |
| 8 | Add for Internal Road | 1000000.00 |
| 9 | Add for Compound Wall | 1000000.00 |
| 10 | Add for Retaining Wall | 750000.00 |
| 11 | Add for Land Leveling | 50000.00 |
| 12 | Add for Rain Water Harvesting | 553351.00 |
| | Estimated cost Rs. | 9733106.02 |
| ( A ) | Say | Rs. 97,33,000.00 |
| | ( B ) GENERAL ABSTRACT for ZP VICE PRESIDENT & CHAIRMANS RESIDENTIAL QUARTER | |
| 1 | Cost of Civil Work | 15008080.00 |
| 3 | Add 11% for Electrification Charges | 1650888.8 |
| 4 | Add 8% for External water supply & Sanitation Charges | 1200646.4 |
| 5 | Add 4% for Contingencies Charges | 600323.2 |
| 6 | Add 2% for Computerisation Charges | 300161.6 |
| 7 | Add 6% for Price Variaiion Rate Charges | 900484.8 |
| 8 | Add for Internal Road | 2000000.00 |
| 9 | Add for Compound Wall | 1500000.00 |
| 10 | Add for Retaining Wall | 1500000.00 |
| 11 | Add for Land Leveling | 750000.00 |
| 12 | Add for Rain Water Harvesting | 552612.00 |
| | Estimated cost Rs. | 25963196.80 |
| ( B ) | Say | Rs. 2,59,63,000.00 |
| | Total (A) + (B ) | Rs.3,56,96,000.00 |

४. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने- (२५१५१२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. या कामी मुख्य अभियंता, सा.बां.वि. किंवा मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, पुणे यांच्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेवून, त्याची प्रत शासनास सादर करावी.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००५१८१३०५०६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत हे. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त नाशिक विभाग, नाशिक
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नंदूरबार
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नंदूरबार
६) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नंदूरबार
७) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नंदूरबार
८) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
९) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नाशिक विभाग, नाशिक
१०) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नंदूरबार
११) अध्यक्ष, जिल्हा परिषद, नंदूरबार, जिल्हा नंदूरबार
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४) सार्वजनिक बांधकाम विभाग, इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१५) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई